**“कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे”**
**ही योजना राष्ट्रीय कृषि विकास योजनेतुन**
**सन २०१४-१५ मध्ये राज्यात राबविण्याकरिता**
**प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वनास ६३१४/प्र.क्र. २०५ /३-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
तारीख: **०१ ऑगस्ट,२०१४**

वाचा

**शासन निर्णय क्रमांकः** कृषि आयुक्तालयाचे प.क्र.जा.क्र./संचा.आत्मा/राकृवियो/कृप्रसंब/ प्र.मा/१३६/२०१४, दि.२१/७/२०१४

प्रस्तावना

राज्यातील कृषि विकास कार्यक्रमाचे महत्व लक्षात घेऊन कृषि आणि कृषि संलग्न विभागातील संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना आधुनिक तंत्रज्ञानाचे प्रशिक्षण देण्याच्या उद्देशाने वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर आणि सदर संस्थेच्या ७ संलग्न विभागीय कृषि प्रशिक्षण संस्था पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, नागपूर व खोपोली, जिल्हा रायगड या संस्थांची स्थापना करण्यात आली आहे. सदर संस्थांच्या बळकटीकरणाचा कार्यक्रम “कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे” या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेखाली सन २०१२-१३ पर्यंत कृति आराखडा अंतर्गत राबविण्यात येत होता. सन २०१३-१४ या वर्षापासून केंद्र शासनाने कृति आराखडा बंद केला आहे. त्यामुळे सन २०१३-१४ या वर्षापासून सदर कार्यक्रम राष्ट्रीय कृषि विकास योजनेमधून राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय मान्यता समितीच्या दि.५ जुलै, २०१४ रोजी मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत “कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे” या कार्यक्रमासाठी सन २०१४-१५ या वर्षासाठी रु.३.६७ कोटी एवढा निधी मंजूर करण्यात आला. सदर निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

२) **" कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे” या योजनेस** सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून मंजूर करण्यात आलेल्या रु.३६७.०० लक्ष (रु.तीन कोटी सदुष्ट लक्ष फक्त) एवढया रक्कमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३) प्रस्तुत योजनेअंतर्गत दिलेल्या मार्गदर्शक सूचना , मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाचे प्रचलित नियम व अटी यानुसार विविध प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे याकरिता संबंधित अधिकाऱ्यांना आवश्यक त्या सूचना संचालक, आत्मा यांनी निर्गमित कराव्यात.

४) सदर प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये वनामती स्तरावर अधिका-यांच्या तसेच आत्मा नियामक मंडळाच्या (GB) सदस्यांच्या (अधिकारी व शेतकरी प्रतिनिधी) प्रशिक्षणाचा समावेश राहील. तसेच रामेती स्तरावरील प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये क्षेत्रिय अधिकारी व कर्मचारी, नवनियुक्त कृषि सेवक, आत्मा जिल्हास्तरीय शेतकरी सल्ला समिती सदस्य (DFAC) व आत्मा तालुका स्तरीय शेतकरी सल्ला समिती सदस्य (BFAC) यांच्या प्रशिक्षणाचा समावेश राहील. तसेच या सर्व प्रशिक्षणांचे कॅलेंडर प्रशिक्षण मोडयुलसह तयार करुन त्यास कृषि आयुक्तालयाची मान्यता घेण्याची कार्यवाही संचालक, वनामती यांनी करावी.

५) वरीलप्रमाणे विविध प्रशिक्षणांचा कार्यक्रम संचालक, वनामती यांनी सर्व संबंधित प्राचार्य, रामेती यांच्या समन्वयाने राबविण्यात यावा. या योजनेसाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत १०० टक्के निधी उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने सन २०१४-१५ मध्ये निधी अखर्चीत राहणार नाही, याची सर्व संबंधित यंत्रणांनी काळजी घ्यावी. तसेच खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, आत्मा यांचेमार्फत वेळोवेळी शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी.

६) हे आदेश मा. अपर मुख्य सचिव, (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०११७२३५६०९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madan Umesh M

Digitally signed by Madan Umesh M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Umesh M
Date: 2014.08.01 17:21:56 +05'30'

**उ.म.मदन**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. आयुक्त (कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
५. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० जादा प्रतींसह)
६. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
८. कृषि सहसंचालक (विस्तार), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१०. सर्व तालुका कृषि अधिकारी,
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६.सर्व सहसचिव / उप सचिव / अवर सचिव (कृषी विभाग),कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
१७. कार्यासन २-अे, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. निवड नस्ती.३अे